**कृति आराखडयाअंतर्गत कृषी क्षेत्रात महिलांचा कार्यक्षम सहभाग ही केंद्र/ राज्य पुरस्कृत योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.कृक्षेम ३९०९/ प्र.क्र. १५७/३-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ६ मार्च, २०१०.**

**वाचा:-** १) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. ३० जुन, २००९
२) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. ९ जुलै, २००९
३) कृषि आयुक्तालयाचे क्र जाक्र कृआ/कृक्षेमस/प्रस्ताव/विप्र-८/३६५/२००८, दि.१५.७.२००९ चे पत्र
४) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.पुरक १००९/ (प्र.क्र. ७६/०९)/ २-अे, दिनांक ६ जुलै, २००९
५) शासन निर्णय क्र.कृक्षेम ३९०९/ प्र.क्र. १५७/३-अे,दिनांक : ३० जुलै, २००९
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./कृआ/कृक्षेमस/विप्र-८/४२९/२००८,दि.१०ऑगस्ट,२००९
७) शासन निर्णय, क्र.कृक्षेम-३९०९/प्र.क्र. १५७/३-अे,दिनांक : २६ ऑगस्ट, २००९
८) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. १५ जानेवारी, २००९
९) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. १५ जानेवारी, २००९
१०) कृषि आयुक्तालयाचे क्र जाक्र कृआ/कृक्षेमस/प्रस्ताव/विप्र-५/९९/२०१०, दि. फेब्रुवारी,२०१० चे पत्र

**प्रस्तावना :**

**कृषि क्षेत्रात महिलांचा अधिक कार्यक्षम सहभाग वाढविणे** या योजनेची व्याप्ती सर्व जिल्ह्यात मोठ्या प्रमाणात वाढविण्याकरिता केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या मान्यतेनुसार सन २००४-०५ पासून ही योजना ७५ टक्के केंद्र हिस्सा व २५ टक्के राज्य हिस्सा म्हणून राबविण्याचा निर्णय घेण्यात आला. ही योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. ३० जुन, २००९ च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार या योजनेचा कार्यक्रम राबविण्याकरिता **प्रशासकिय व वित्तीय** मान्यता संदर्भाधीन दि.२६ ऑगस्ट, २००९ अन्वये देण्यात आली आहे. आता केंद्र शासनाने दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरित करण्याकरिता संदर्भाधीन दि.१५ जानेवारी, २०१० आणि २५ जानेवारी, २०१० च्या पत्रान्वये दिलेल्या प्रशासकीय व वित्तीय मान्यतेनुसार या योजनेचा कार्यक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कृषि क्षेत्राच्या विकासात महिलांच्या सहभागाचे असलेले महत्व विचारात घेऊन **कृषि क्षेत्रात महिलांचा अधिक कार्यक्षम सहभाग** ही योजना राबविण्यास सन २००९-१० मध्ये केंद्रिय कृषि मंत्रालयाने संदर्भाधित दि.१५ जानेवारी, २००९ आणि २५ जानेवारी, २०१० च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून, या योजनेचा कार्यक्रम राबविण्यासाठी रु.१२७.३५ लक्ष (रुपये एक कोटी सत्तावीस लक्ष पस्तीस हजार फक्त) इतक्या कार्यक्रमापैकी रु ५५.७५ लक्षच्या कार्यक्रमास राज्य शासनाची **प्रशासकीय** मान्यता आणि संदर्भाधीन दि.१५ व २५ जानेवारी, २०१० च्या पत्रास अनुसरुन

रु १२७.३५ लक्ष (रुपये एक कोटी सत्तावीस लक्ष पस्तीस हजार फक्त) च्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. यामध्ये ७५% केंद्र हिस्सा म्हणून रु.९५.५१ लक्ष (पंच्याण्णव लक्ष एकावन्न हजार फक्त) व २५% राज्य हिस्सा म्हणून रु ३१.८४ लक्ष (एकतीस लाक्ष चौऱ्यांऐशी हजार फक्त) असा राहिल.

२. **कृषि क्षेत्रात महिलांचा अधिक कार्यक्षम सहभाग** ही योजना सन २००९-१० या वर्षामध्ये ही योजना नवीन ७० तालुक्यात राबविण्यात येणार आहे याप्रमाणे एकूण २८१ तालुक्यात ही योजना राबवावयाची आहे. (तालुक्यांची यादी संदर्भाधीन दि.२६ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयासोबत जोडल्याप्रमाणे राहील.) या योजनेचा प्रमुख उद्देश महिला शेतक-यांचे गट स्थापन करुन शेती व शेती पूरक व्यवसाय व्यवस्थापनेत त्यांना आत्मनिर्भर करणे, नवीन तंत्रज्ञानाविषयी प्रशिक्षण देणे, प्रात्यक्षिके व व्यावसायिक प्रशिक्षणाव्दारे आर्थिकदृष्टया स्वावलंबी करणे हा आहे. कृषि क्षेत्रात **महिलांचा अधिक कार्यक्षम सहभाग** वाढविणे या योजनेच्या सन २००९-१० मधील अंमलबजावणीच्या तपशिलानुसार योजनेचा एकूण रु. १७१.६० लक्ष (रु.एक कोटी एकाहत्तर लक्ष साठ हजार फक्त) चा घटकनिहाय तपशिल दि.३० जुलैच्या शासन निर्णयाप्रमाणे राहील. केंद्र शासनाने **महिला मेळावा व प्रदर्शन** या घटकास मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने संदर्भाधीन दि.१५ जानेवारी, २०१० अन्वये पुरवणी प्रस्तावानुसार मंजूर केलेल्या रु.५५.७५ लक्ष(रु.पंचावन्न लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) चा घटकनिहाय कार्यक्रम खाली दर्शविल्याप्रमाणे राहील :-

**(रु.लाखात)**

| **अ.क्र** | **घटक** | **पुरवणी प्रस्तावान्वय प्राप्त मंजूर निधी** | **प्रशासकीय व वित्तीय मान्यता** |
|---|---|---|---|
| १ | महिला प्रदर्शन व मेळावा | ५५.७५ | ५५.७५ |
| | **एकूण :** | **५५.७५** | **५५.७५** |

या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता उद्दीष्टनिहाय सूचना निर्गमित करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. संदर्भाधीन दि.३० जुलै, २००९ च्या शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून योजना राबविण्यात यावी.

४. केंद्रिय कृषी मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना, मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटी यानुसार खर्च करण्यात यावा. या योजनेकरिता मंजूर केलेला निधी खर्च करण्यास संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. राज्यातील संबंधित कृषी सहसंचालक अथवा अन्य अधिकाऱ्यांना आवश्यकतेनुसार या मंजूर निधीचे वाटप करण्यास आणि त्याच्या वापराबाबत मार्गदर्शक सूचना देण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर निधीचे वाटप वित्त विभागाने विकसित केलेल्या संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणाली व्दारे मासिक निधी विवरण पत्राच्या मर्यादेत करण्यात यावे. सदर निधी खर्च करतांना मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहिल याची जबाबदारी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांची राहिल.

६. सन २००९-१० मध्ये **कृषी क्षेत्रात महिलांचा कार्यक्षम सहभाग वाढविणे** या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी होणारा केंद्र व राज्य हिश्श्याचा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २००९-१० च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**केंद्र हिस्सा -**
मागणी क्रमांक डी-३

२४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - केन्द्र पुरस्कृत योजना
(०१)(१४) कृषि क्षेत्रात महिलांचा  कार्यक्षम सहभाग
३३ अर्थसहाय्य (२४०१ ३०१९)

**राज्य हिस्सा -**
मागणी क्रमांक डी-३
२४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - केन्द्र पुरस्कृत योजना (राज्य योजना)
(०१)(३८) कृषि क्षेत्रात महिलांचा कार्यक्षम सहभाग
३३ अर्थसहाय्य (२४०१ ४३५६)

७. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक :- ३४ अे/१०/व्यय-१, दिनांक २४ फेब्रुवारी, २०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८ सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००३१२१८४८३१००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**[ वीणा राऊत ]**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त
संचालक, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व संचालक/ सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विभाग समिती (सर्व),
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, अकोला,
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर,

महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विधान मंडळ सदस्य, विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
सर्व अध्यक्ष, जिल्हा परिषदा,
सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (कृषि),कृषि व पदुम विभाग
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
सहसंचालक (विघयो), समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग व्यय-१, मंत्रालय, मुंबई-३२, /नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती